**मुंबई विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालये/परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विषय, विद्याशाखा, तुकडया इत्यादींचे तपासणी करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन,**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक: संकीर्ण २०१८/प्र.क्र.७१/विशि-३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-** शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१८/प्र.क्र.७१/विशि-३, दि. १४ जून, २०१८.

**प्रस्तावना:-**

दिनांक ७ फेब्रुवारी, २०१८ रोजी राजभवन, मुंबई येथे मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे अध्यक्षतेखाली व मा. मुख्यमंत्री, मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), कुलगुरू, मुंबई विद्यापीठ यांच्या उपस्थितीत झालेल्या बैठकीमध्ये मुंबई विद्यापीठांत राबविण्यात आलेल्या On Screen Marking (OSM) व अनुषंगिक मुद्यांवर चर्चा करण्यात आली. या चर्चेमध्ये On Screen Marking (OSM) प्रणालीवर टॅग केलेल्या शिक्षकांचा अत्यल्प सहभाग राहिल्याने तसेच उत्तर पत्रिकांचे मुल्यांकन वेळेत न होऊ शकल्याने विद्यार्थी व पालकांना विनाकारण मन:स्ताप करावा लागला. तसेच त्यांना भविष्यात उच्च शिक्षणाच्या दृष्टीने अनेक अडचणींना तोंड द्यावे लागल्याची बाब निदर्शनास आली. उच्च शिक्षणाच्या संदर्भात मुंबई विद्यापीठाचे ऐतिहासिक स्थान व महत्व लक्षांत घेता मुंबई विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालये / परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विद्याशाखा, अभ्यासक्रम, विषय, तुकडया इत्यादींची तपासणी करणे आवश्यक असल्याचे मत सदर बैठकीमध्ये व्यक्त करण्यात आले.

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ नुसार विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रातील उच्च शिक्षणाचे अध्यापन, अध्ययन, कार्यक्षम व संवेदनशील प्रशासन, शास्त्रशुध्द व तंत्रज्ञानात्मक व्यवस्थापन करण्याची तरतूद आहे. तसेच व्यवस्थापनाची व्यवहार्यता आणि वेळोवेळी निर्धारित केल्याप्रमाणे महाविद्यालयांच्या, विद्याशाखांच्या आणि विषयाच्या शैक्षणिक कामगिरीची मानके विचारात घेता, महाविद्यालयाच्या संलग्निकरणाच्या आणि परिसंस्थांच्या मान्यतेच्या शर्ती निर्धारित करणे आणि त्या शर्तींची पूर्तता करण्यात आली आहे याबाबत नियतकालिक किंवा अन्य प्रकारे मूल्यांकन करुन स्वत:ची खात्री पटविणे अशीही जबाबदारी विद्यापीठावर आहे. या पार्श्वभूमीवर मुंबई विद्यापीठाशी संलग्नित असलेल्या सुमारे ७७८ महाविद्यालये / परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम,विद्याशाखा, विषय, तुकडया इत्यादींची त्रयस्थ व्यवस्थेमार्फत तपासणी करण्याबाबतचा निर्णय घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन शुध्दीपत्रक :-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ नुसार मुंबई विद्यापीठाशी संलग्नित असलेल्या सुमारे ७७८ महाविद्यालये/ परिसंस्था व त्यांचे अभ्याक्रम, विद्याशाखा, विषय, तुकडया इत्यादिंचे त्रयस्थ व्यवस्थेमार्फत तपासणी करण्यासाठी खालील प्रमाणे १.राज्यस्तरीय समिती, २. कार्यबल गटाची (Task Force ) व ३. जिल्हास्तरीय निरिक्षण समिती स्थापन करण्यात येत आहे.

## १. राज्यस्तरीय समिती:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव, गृह विभाग | सदस्य |
| ४. | सह सचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१. कार्यबल गट (Task Force) आवश्यक तेव्हा मार्गदर्शन करणे

२. कार्यबल गटाने सादर केलेल्या अहवालाच्या आधारे कृति-आराखडा (Action Plan) तयार करुन शासनामार्फत मा.कुलपती यांचेकडे सादर करणे. कृती आराखडयाद्वारे खालील बाबी निश्चित करण्यात येतील.

अ) ज्या संस्थानी नियमांचे उल्लंघन केले आहे अशा संस्थाविरुध्द करावयाची कार्यवाही / उपाययोजना सूचविणे.

ब) प्रचलीत यंत्रणा वा कार्यपध्दतीमध्ये करावयाच्या सुधारणा आणि उपाययोजना सूचविणे.

क) महाविद्यालये/संस्था यांच्याकडून संबंधीत नियमांच्या उल्लंघनाची पुनरावृत्ती टाळण्यासाठी विद्यापीठास मार्गदर्शक सूचना देणे.

## २. कार्यबल गट (Task Force)-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १. | श्री. विकासचंद्र रस्तोगी, प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | डॉ.आर.एस.माळी, माजी कुलगुरू, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | सदस्य |
| ३. | डॉ.गोविंद पारटकर, माजी प्राचार्य, वझे केळकर महाविद्यालय, मुंबई | सदस्य |
| ४. | श्री. व्यंकटरमणी, सेवानिवृत्त कुलसचिव, मुंबई विद्यापीठ | सदस्य |
| ५. | श्री. धनराज माने, संचालक, उच्च शिक्षण, पुणे | सदस्य सचिव |

**कार्यबल गटाची कार्यकक्षा :-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०८, ११०, १११, ११२, ११३, ११४, ११५, ११६ व ११७ मध्ये संलग्निकरण व नुतनीकरणाच्या तरतुदी विहित केल्या आहेत. त्यानुषंगाने मुंबई विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालये/परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विद्याशाखा, विषय, तुकडया इत्यादींचे शैक्षणिक व तद्नुषंगिक विषयाच्या अनुषंगाने तपासणी करणे.

**१.** कार्यबल गट विद्यापीठाशी संलग्नित सर्व महाविद्यालये/ परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विषय, विद्याशाखा, तुकडया इत्यादींची खालील मुद्यांवर तपासणी करुन प्राप्त निष्कर्षाच्या आधारे सविस्तर अहवाल राज्यस्तरीय समितीला सादर करील.

अ) युजीसी / एआयसीटीई /बार कौन्सिल ऑफ इंडिया /कौन्सिल ऑफ आर्कीटेक्चर/ एनसीटीई इत्यादि सक्षम प्राधिकरणानी विहीत केलेल्या निकषानुसार संलग्नित महाविद्यालये व परिसंस्थांमध्ये भौतिक सोयी व सुविधा उपलब्ध आहेत का याबाबतची तपासणी करणे.

आ) सक्षम प्राधिकरणानी विहित केलेल्या निकषानुसार, संलग्नित महाविद्यालयामध्ये अर्हताधारक शिक्षकांची अभ्यासक्रमनिहाय उपलब्धता आहे किंवा कसे याची तपासणी आहे का याबाबतची तपासणी करणे.

इ) महाविद्यालये /परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विषय, विद्याशाखातुकडया इत्यादिंचे संलग्नीकरण व त्याचे नुतनीकरण विहित तरतुदीनुसार करण्यात येत आहे तसेच त्यानुसार आवश्यक त्या फीचा भरणा / वसूली विद्यापिठाकडे जमा होत आहे किंवा कसे.

ई) महाविद्यालये /परिसंस्था व त्यांचे अभ्यासक्रम, विषय, विद्याशाखा, तुकडया इत्यादिंचे संलग्नीकरण व त्याचे नुतनीकरणासाठीच्या कार्यपध्दतीचे विश्लेषण करून आदर्श कार्यप्रणालीची (Standard Operating Procedure) शिफारस करणे.

**२.** शासकीय, अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये इत्यादिंनी NAAC/NBA मूल्यांकनाद्वारे मान्यता (Accredition) प्राप्त केली आहे किंवा कसे याची तपासणी करणे.

**३. जिल्हास्तरीय निरिक्षण समिती :-**

| **अ. क्र.** | अधिका-याचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| ३ | वित्त व लेखा अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४ | उप विभागीय अधिकारी (महसूल) | सदस्य |
| ५ | १. मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा: सह संचालक, उच्च शिक्षण मुंबई.<br>२. ठाणे व पालघर जिल्हा : सह संचालक, तंत्र शिक्षण<br>३. रायगड,रत्नागिरी व सिंधुदूर्ग: सह संचालक, उच्च शिक्षण, पनवेल | सदस्य सचिव |

**जिल्हास्तरीय निरिक्षण समितीची कार्यकक्षा :-** कार्यबल गटाच्या (Task Force) निर्देशानुसार कार्यवाही करणे.

**सर्वसाधारण सुचना :-**

१. राज्यस्तरीय मुख्य समिती आवश्यकतेनुसार कार्यबल गटाला (Task Force) कामकाजाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सुचना देऊ शकेल.

२. राज्यस्तरीय मुख्य समितीने आपला अहवाल व उपाय योजनात्मक कृतीआराखडा तीन महिन्यात शासनामार्फत मा.कुलपती यांचेकडे सादर करावा.
३. कार्यबल गटाने (Task Force) जिल्हा निरिक्षण समितीमार्फत करावयाची कार्यवाही बाबतचे नियोजन व वेळापत्रक आपल्या सोयीनुसार तयार करावे.
४. कार्यबल गट (Task Force) आवश्यकतेनुसार तक्त्यांचे नमुने विहित करून जिल्हा समितीमार्फत महाविद्यालयांकडून माहिती संकलित करू शकेल.
५. उपरोक्त नमूद तीनही समित्यांची प्रथम बैठक मा. अ.मु.स./ प्र.स./सचिव,उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रालय, मुंबई येथे घेण्यात येईल व सदर बैठकीत पुढील कामकाजाची दिशा ठरविण्यात येईल.
६. कार्यबल गटाच्या (Task Force) बैठका मुंबई विद्यापीठात घेण्यात येतील. त्यानुषंगाने कामकाज करण्यासाठी कार्यबल गटाला लागणारे आवश्यक ते संपूर्ण सहकार्य मुंबई विद्यापीठाने उपलब्ध करून द्यावे.
७. मुंबई विद्यापीठाने कार्यबल गटाच्या कामासाठी (Task Force) एक उपकुल सचिव/सहाय्यक कुलसचिव या दर्जाच्या अधिका-याची समन्वयक अधिकारी म्हणून नियुक्ती करावी.
८. समितीतील अशासकीय सदस्यांचे प्रवास व इतर भत्ते नियमानुसार मुंबई विद्यापीठाने विहित केलेल्या नियमानुसार अदा करणे बंधनकारक राहील.
९. उपरोक्त प्रमाणे सूचना महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम ८(६) अंतर्गत राज्य शासनाला असलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१७५२५३९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.10.12 17:54:48 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. कुलगुरु/कुल सचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
६. श्री. धनराज माने, संचालक, उच्च शिक्षण, पुणे.
७. श्री. विकासचंद्र रस्तोगी, प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प,मुंबई.

८. जिल्हाधिकारी,मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,( मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग)
१०. वित्त व लेखा अधिकारी, महानगरपालिका मुंबई.
११. वित्त व लेखा अधिकारी, जिल्हापरिषद . (ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग)
१२. डॉ.आर.एस.माळी, माजी कुलगुरू, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ,जळगाव.
१३. डॉ.गोविंद पारटकर, माजी प्राचार्य, वझे केळकर महाविद्यालय, मुंबई.
१४. श्री. व्यंकटरमणी, सेवानिवृत्त कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
१५. सह संचालक, उच्च शिक्षण, मुंबई व मुंबई उपनगर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग.
१६. सह संचालक, तंत्र शिक्षण, ठाणे व पालघर.
१७. मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८. सचिव यांचे स्वीय सहाय्यक, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती (विशि-३).